सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत- वाई तालुका सहकारी सूतगिरणी मर्या., बावधन, ता.वाई, जि.सातारा.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प १२२४/प्र.क्र.९४/टेक्स १ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०६ जून, २०२५.

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि.२४.३.१९९९.
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१, दि.१३.६.२०००.
३. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ), दि.३०.०६.२०११.
४. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२१३/प्र.क्र.८२/टेक्स-१(ब), दि.२५.११.२०१३.
५. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१६/प्र.क्र.८१/टेक्स-१(अ), दि.१०.०७.२०१७.
६. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२१५/प्र.क्र.५०/टेक्स-१ (अ), दि.१७.०६.२०२१.
७. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२२०/प्र.क्र.५०/टेक्स-१(अ), दि.०७.०६.२०२३.
८. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२२३/प्र.क्र.८/टेक्स-१ (ब), दि.२६.०७.२०२३.
९. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२२३/प्र.क्र.८/टेक्स-१ (ब), दि.११.०३.२०२४.
१०. आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे पत्र क्र.कार्या-६(१) (सूतगि)/प्रकल्प/वाई तालुका/८२८२/२०२४, दि.३०.०९.२०२४.
११. शासन पत्र, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: प्रकल्प-१२२४/प्र.क्र.९४/टेक्स-१(अ), दि.१८.०२.२०२५. (सुकाणू समिती इतिवृत्त)

प्रस्तावना :-

वाई तालुका सहकारी सूतगिरणी मर्या., बावधन, ता.वाई, जि.सातारा या सूतगिरणीची नोंदणी दि.१७.०८.१९९१ रोजी करण्यात आली असून तिचा नोंदणी क्रमांक SAT/PRG/A/४ असा आहे. सूतगिरणीचे कार्यक्षेत्र खंडाळा व वाई तालुक्यापूरते मर्यादित आहे. शासन निर्णय दिनांक ०२.११.१९९२ अन्वये सूतगिरणीचा आठव्या पंचवार्षिक योजनेत समावेश करुन शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली आहे. शासनाने

दि.३०.०६.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये, राज्यातील सहकारी सूतगिरण्यांच्या प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत रु.६१७४.२४ लाख इतकी निश्चित केली आहे. त्यानुसार शासन निर्णय दि.२५.११.२०१३ अन्वये शासनाने या सूतगिरणीच्या रु.५९००.०० लाख प्रकल्प किंमतीस मान्यता दिलेली आहे. सदर प्रकल्प अहवाल किंमतीनुसार सूतगिरणीस आत्तापर्यंत रु.२५८०.९० लाख इतके शासकीय भागभांडवल अदा केलेले आहे.

२. शासन निर्णय दिनांक १७.०६.२०२१ अन्वये सहकारी सूतगिरण्यांचा प्रकल्प अहवाल रु.८०.९० कोटीच्या सहकारी सूतगिरणीची प्रकल्प किंमत रु.८०.९० कोटी इतकी निश्चित करण्यास मान्यता दिलेली आहे. तसेच, शासन निर्णय दि.२६.०७.२०२३ अन्वये सहकारी सूतगिरण्यांचा प्रकल्प अहवाल रु.८०.९० कोटीच्या मर्यादेत प्रो-रेटा पध्दतीने निश्चित करणेसाठी सुधारित कार्यपध्दती निश्चित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये दिनांक ११.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. आयुक्त (वस्त्रोद्योग) यांनी दिनांक ३०.०९.२०२४ अन्वये सदर सूतगिरणीचा सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीच्या दि.०६.०२.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत वाई तालुका सहकारी सूतगिरणी मर्या., बावधन, ता.वाई, जि.सातारा या सूतगिरणीच्या सुधारित प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन रु.७१८७.५६ लाख किंमतीचा प्रकल्प अहवालास अंतीम मान्यता अटीच्या अधीन राहून देण्याबाबतचा निर्णय झाला. त्यानुसार सदर सूतगिरणीचा प्रकल्प अहवाल सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वाई तालुका सहकारी सूतगिरणी मर्या., बावधन, ता.वाई, जि.सातारा या सूतगिरणीची सध्याची रु.५९००.०० लाख रक्कमेची प्रकल्प किंमत रु.८०९०.०० लाख किंमतीच्या मर्यादेत प्रो-रेटा नुसार रु.७१८७.५६ लाख इतक्या रक्कमेच्या सुधारित प्रकल्प किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे : -

**"वाई तालुका सहकारी सूतगिरणी मर्या., बावधन, ता.वाई, जि.सातारा या सूतगिरणीने सध्याच्या मंजूर प्रकल्प अहवाल किंमतीनूसार उभारावयाची ५% सभासद भागभांडवलाची रक्कम व प्रकल्पाच्या ५०% मुदती कर्जाची उर्वरीत रक्कम उभारुन प्रकल्पावर खर्च केल्यानंतरच व केलेल्या खर्चाचा विनियोग दाखला आयुक्त, वस्त्रोद्योग यांचेकडून सादर केल्यानंतरच सूतगिरणीस सुधारित प्रकल्प अहवाल रुपये ७१८७.५६ लाख किंमतीच्या मर्यादेत देय असलेले उर्वरीत शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येईल."**

२. सदर सुतगिरणीवर खालील बाबी बंधनकारक राहतील.

१. सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.

२. शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.

३. सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

४. सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

५. सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

६. सदर सूतगिरणी सर्वसाधारण प्रवर्गातील असल्याने शासनाने भविष्यात काही अटी/शर्ती घातल्यास त्या या सूतगिरणीवर बंधनकारक असतील.

७. दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

३. या सूतगिरणीचे सभासद भागभांडवल व शासकीय भागभांडवल यांचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने सुधारित प्रकल्प अहवालानुसार पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करावयाचा आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशिल | प्रकल्प किंमतीनुसार उभारावयाची रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | सभासद भागभांडवल (५%) | ३५९.३८ |
| २ | शासकीय भागभांडवल (४५%) | ३२३४.४० |
| ३ | दीर्घ मुदती कर्ज (५०%) | ३५९३.७८ |
| | एकूण | ७१८७.५६ |

४. या सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्यामर्यादेत या सूतगिरणीने खर्च करणे सूतगिरणीस बंधनकारक राहील.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | तपशिल | मंजूर मुळ प्रकल्प अहवालानुसार | दि.१७.६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार सुधारित प्रकल्प अहवाल किंमत | **प्रो-रेटा पध्दतीने केलेली प्रकल्पाची सुधारित किंमत** |
|---|---|---|---|---|
| १ | जमीन व जमीन सुधारणा | ५८.०६ | १७२.०० | **१०७.६०** |
| २ | फॅक्टरी इमारत व इतर बांधकाम | ९४१.०९ | १९०८.३८ | **१४५०.१०** |
| ३ | प्लँट अँड मशिनरी | ३१०२.७८ | ४०६७.३० | **३७२०.०७** |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ८४५.०० | ९११.०० | **८८२.४७** |
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ६१.०० | ८८.८७ | **८४.८८** |
| ६ | प्रिऑपरेटिव्ह खर्च | २०८.१६ | १८७.०० | **१८७.००** |
| ७ | मार्जीन मनी | ४१०.०० | ४११.१२ | **४११.१२** |
| ८ | कॉन्टीजंसी | २७३.७७ | ३४४.३३ | **३४४.३३** |
| | **एकूण** | **५९००.००** | **८०९०.००** | **७१८७.५६** |

५. सूतगिरणीने रु.७१८७.५६ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास जास्तीची रक्कम सूतगिरणीने स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील. प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूतगिरणीला स्वत: करावा लागेल. तसेच यंत्रसामुग्री खरेदी व स्थापत्य बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ नुसार मान्यता घ्यावी. सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०६१५४७४०७६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2025.06.06 15:48:37 +05'30'

**(श्रीकृष्ण पवार)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. जिल्हाधिकारी, सातारा.
८. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर.
९. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, सातारा.
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई-०१.
११. कार्यासन अधिकारी १६-स / १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत).
१३. अध्यक्ष, वाई तालुका सहकारी सूतगिरणी मर्या., बावधन, ता.वाई, जि.सातारा.
१४. निवडनस्ती (टेक्स १ (अ)/(ब)).